**मुंबई मेट्रो मार्ग २ दहिसर-चारकोप-वांद्रे-मानखुर्द मेट्रो मार्ग टप्पा-२ ब डी.एन.नगर - मंडाळे व मुंबई मेट्रो मार्ग ४ वडाळा - घाटकोपर - मुलुंड - ठाणे - कासारवडवली या मार्गिकांस मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : एमआरडी-३३१६/प्र.क्र.४१/नवि-७**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : २५ ऑक्टोंबर, २०१६.

संदर्भ : (१) शासन निर्णय क्रमांक एमआरडी-३३१५/प्र.क्र.११३/नवि-७, दिनांक १७ ऑक्टोबर, २०१५.
(२) शासन निर्णय क्रमांक एमआरडी-३३१५/प्र.क्र.११४/नवि-७, दिनांक १७ ऑक्टोबर, २०१५.

**प्रस्तावना :**

मुंबईतील वाहतूकीची कोंडी कमी करण्यासाठी मुंबई मेट्रो बृहत आराखडयातील मेट्रो मार्गांची लवकरात लवकर अंमलबजावणी करण्यासाठी मुंबई मेट्रो मार्गांची पुढील ३ ते ४ वर्षात खाली नमूद केलेल्या ११८ कि.मी. लांबीच्या उन्नत मेट्रो रेल्वे मार्गाची त्वरीत अंमलबजावणी करण्याचे मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाने ठरविले आहे.

| अ. क्र. | मार्गिकांची नावे | लांबी |
|---|---|---|
| १ | • दहिसर (प) - डी.एन.नगर-वांद्रे | २७ कि.मी |
| | • वांद्रे - मानखुर्द | १३ कि.मी |
| २ | • वडाळा-घाटकोपर-ठाणे -कासारवडवली | २२ कि.मी + १० कि.मी |
| | • वडाळा - मुख्य डाक कार्यालय (GPO)- आर.ए. किडवाई रोड मार्गे | ८ कि.मी |
| ३ | • दहिसर (पू) - अंधेरी (पू) | १८ कि.मी |
| | • अंधेरी (पू) - वांद्रे (पू) | ९ कि.मी |
| ४ | • जोगेश्वरी - विक्रोळी लिंक रोड | ११ कि.मी |
| **एकूण** | | **११८.कि.मी** |

मुंबईतील वाहतूकीची कोंडी कमी करण्यासाठी मुंबई मेट्रो बृहत आराखडयातील मेट्रो मार्गांची लवकरात लवकर अंमलबजावणी करण्यासाठी मुंबई मेट्रो मार्गांची पुढील ३ ते ४ वर्षात ११८ कि.मी. लांबीच्या उन्नत मेट्रो रेल्वे मार्गाची त्वरीत अंमलबजावणी करण्याचे मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाने ठरविले आहे. या मेट्रो रेल्वे मार्गांची त्वरीत अंमलबजावणी करण्यासाठी

प्रस्तावित मेट्रो रेल्वे प्रकल्पाचा बृहत आराखडयामधील रेल्वे मार्गांची तपासणी पुनर्विलोकन, अद्ययावतीकरण व सविस्तर प्रकल्प अहवाल तयार करुन घेण्यासाठी दिल्ली मेट्रो रेल्वे कॉर्पोरेशन मर्यादित (DMRC) यांची मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणामार्फत (एमएमआरडीए) सल्लागार म्हणून नियुक्ती करण्यात आली. उपरोक्त मेट्रो रेल्वे मार्गांची त्वरीत अंमलबजावणी करण्यासाठी प्रस्तावित मेट्रो रेल्वे प्रकल्प मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणामार्फत अंमलबजावणी करण्यास तसेच उपरोक्त मार्गिकापैकी मुंबई मेट्रो लाईन-२ दहिसर-चारकोप-वांद्रे-मानखुर्द मेट्रो मार्ग टप्पा १ दहिसर (पू) - डी.एन.नगर या मार्गिकेस शासनाने संदर्भ क्रमांक (१) वरील शासन निर्णयान्वये मान्यता दिली आहे. उपरोक्त मार्गिकापैकी मुंबई मेट्रो-७ अंधेरी §पूर्व § ते दहिसर पूर्व या मार्गिकेस शासनाने संदर्भ क्रमांक (२) वरील शासन निर्णयान्वये मान्यता दिली आहे.

आता मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाने उपरोक्त मार्गिकापैकी दिल्ली मेट्रो रेल्वे महामंडळ मर्यादित यांनी प्राधिकरणाकडे सादर केलेल्या मेट्रो २ब डी.एन.नगर - मंडाळे आणि मेट्रो मार्ग ४ - वडाळा - घाटकोपर - मुलुंड - ठाणे -कासारवडवली या मेट्रो प्रकल्पांच्या सविस्तर प्रकल्प अहवालासह शासनाच्या मान्यतेसाठी सादर केले आहे. सदर प्रकल्पांच्या प्रस्तावास राज्य शासनाकडून मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. याबाबत शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय :-**

मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण यांनी सादर केलेल्या मुंबई मेट्रो मार्ग २ दहिसर-चारकोप-वांद्रे-मानखुर्द मेट्रो मार्ग टप्पा-२ ब डी.एन.नगर - मंडाळे आणि मेट्रो मार्ग ४ - वडाळा - घाटकोपर - मुलुंड - ठाणे -कासारवडवली या मेट्रो प्रकल्पांची अंमलबजावणी करण्यास पुढील प्रमाणे मान्यता देण्यात येत आहे.

१) मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण (एमएमआरडीए) यांनी सादर केलेल्या मेट्रो २ब डी.एन.नगर - मंडाळे (लांबी : २३.६४३ कि.मी., स्थानके : २२) (विस्तृत तपशील सोबत परिशिष्ट-१ म्हणून जोडला आहे.) आणि मेट्रो मार्ग ४ - वडाळा - घाटकोपर - मुलुंड - ठाणे - कासारवडवली (लांबी : ३२.३२ कि.मी., स्थानके : ३२) (विस्तृत तपशील सोबत परिशिष्ट-२ म्हणून जोडला आहे.) या मेट्रो प्रकल्पांची मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणामार्फत अंमलबजावणी करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२) मेट्रो मार्ग २ - दहिसर - चारकोप - वांद्रे - मानखुर्द मेट्रो मार्गाचा टप्पा क्र. २ ब- डी.एन.नगर - मंडाळे या प्रकल्पाच्या पूर्णत्वाची एकूण किंमत रु. १०९८६ कोटी आणि मेट्रो मार्ग ४ - वडाळा - घाटकोपर - मुलुंड - ठाणे -कासारवडवली या प्रकल्पाच्या पूर्णत्वाची एकूण रु.१४५४९ कोटी किंमतीस मान्यता देण्यात येत आहे.

३) मेट्रो मार्ग २ - दहिसर - चारकोप - वांद्रे - मानखुर्द मेट्रो मार्गाचा टप्पा क्र. २ब - डी.एन.नगर - मंडाळे आणि मेट्रो मार्ग ४ - वडाळा - घाटकोपर - मुलुंड - ठाणे -कासारवडवली या मेट्रो

मार्गाची अंमलबजावणी 'मेट्रो कायदा २००९ (सुधारित)' नुसार करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

४) मेट्रो मार्ग २ - दहिसर - चारकोप - वांद्रे - मानखुर्द मेट्रो मार्गाचा टप्पा क्र. २ब - डी.एन.नगर - मंडाळे आणि मेट्रो मार्ग ४ - वडाळा - घाटकोपर - मुलुंड - ठाणे -कासारवडवली या मेट्रो मार्गांच्या मार्गिकेमध्ये तसेच मेट्रो स्थानकांमध्ये गरज वाटल्यास किरकोळ बदल करण्याची मान्यता देण्यात येत आहे

५) मेट्रो मार्ग २ब ची अंमलबजावणी प्राधिकरणाकडील स्वत:चा निधी व एशियन डेव्हलपमेंट बँक (ADB) कडून कर्ज घेऊन करावी. या कर्ज घेण्यात काही अडचण आल्यास जागतिक बँक/जपान आंतरराष्ट्रीय सहकारी संस्था (JICA), BRICS, AIB Bank, External Commercial Borrowing (ECB), Bonds, या आंतरराष्ट्रीय/आंतर्देशीय किंवा इतर व्दिपक्षीय, बहुपक्षीय वित्तीय संस्थेकडून कर्ज सहाय्य त्याचे कोणतेही दायित्व/जबाबदारी राज्यशासनावर येणार नाही या अटीवर एमएमआरडीएने घेण्याच्या प्रस्तावास मान्यता देण्यात येत आहे.

६) तसेच, मेट्रो मार्ग -४ प्रकल्पाच्या अंमलबजावणीकरीता प्राधिकरणाकडील स्वत:चा निधी व जागतिक बँक / KFW/ एशियन विकास बँक / जपान आंतरराष्ट्रीय/आंतर्देशीय सहकार्य संस्था इ. आंतरराष्ट्रीय वित्तीय संस्थेमार्फत कर्ज सहाय्य त्याचे कोणतेही दायित्व/जबाबदारी राज्यशासनावर येणार नाही या अटीवर एमएमआरडीएने घेण्याच्या प्रस्तावास मान्यता देण्यात येत आहे.

७) मेट्रो मार्ग-४ साठी केंद्र शासनाच्या निधी उपलब्धतेची वाट न पाहता प्राधिकरणाचा निधी वापरुन मेट्रो प्रकल्पाची अंमलबजावणी करण्यास मान्यता देण्यात येत आहे. सदर प्रकल्पाकरीता बहुपक्षीय / व्दिपक्षीय आंतरराष्ट्रीय/आंतर्देशीय वित्तीय संस्थाकडून थेट कर्ज त्याचे कोणतेही दायित्व/जबाबदारी राज्यशासनावर येणार नाही या अटीवर एमएमआरडीएने घेण्यास प्राधिकरणास प्राधिकृत करण्यात येत आहे.

८) मेट्रो मार्ग -२ब आणि मेट्रो मार्ग -४ हे प्रकल्प सन २०२१ पर्यंत पूर्ण करावयाचे उद्दिष्ट असल्याने, प्रकल्पांच्या स्थापत्य बांधकामाच्या सुरुवातीला प्राधिकरणाचा निधी वापरुन पूर्ण करण्यासाठी लागणाऱ्या अनुक्रमे रु.३,१३० कोटी आणि रु. ५,०४७ कोटी खर्चास मान्यता देण्यात येत आहे.

९) मेट्रो मार्ग -२ब आणि मेट्रो मार्ग -४ या दोन्ही प्रकल्पांसाठी द्विपक्षीय/ बहुपक्षीय/ आंतरराष्ट्रीय /आंतर्देशीय अशा विविध वित्तीय संस्थांकडून कर्ज त्याचे कोणतेही दायित्व/जबाबदारी राज्यशासनावर येणार नाही या अटीवर एमएमआरडीएने घेणेसाठी केंद्र सरकार आणि आंतरराष्ट्रीय वित्तीय संस्था यांच्याबरोबर समन्वय साधणे आणि प्रकल्प अंमलबजावणीच्या पुढील सर्व कार्यवाहीकरीता मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाला प्राधिकृत करण्यात येत आहे.

१०) मुं.म.प्र.वि.प्राधिकरण ADB किंवा इतर वित्तीय संस्थांकडून थेट कर्ज घेण्यास व त्यासाठीची सुरक्षा रक्कम (Guarantee Fee) प्राधिकरणामार्फत देण्यास व त्याचे कोणतेही दायित्व/जबाबदारी राज्यशासनावर येणार नाही, या अटीवर मान्यता देण्यात येत आहे.

११) सोबतच्या परिशिष्ठ-३ मधील तक्त्यात नमूद केल्याप्रमाणे प्राधिकरणातर्फे सहभाग भागभांडवल उभारुन त्यामधील कर्जाचे कोणतेही दायित्व/जबाबदारी राज्यशासनावर येणार नाही, या अटीवर प्रकल्प पूर्ण करण्यासाठी मान्यता देण्यात येत आहे.

१२) मेट्रो मार्ग -२ब प्रकल्पासाठी केंद्र शासनाचा कर (५०%) आणि राज्य शासनाचा कर (१००%) मिळून राज्य शासनाकडून रु. १२९० कोटी आणि मेट्रो मार्ग -४ या प्रकल्पासाठी केंद्र शासनाचा कर (५०%) आणि राज्य शासनाचा कर (१००%) तसेच खाजगी जमीनीच्या किंमतीसह मिळून रु. ३६९३ कोटी दुय्यम कर्ज त्याची राज्यशासनास व्याजासहीत परतफेड करण्याच्या अटीवर देण्यास मान्यता देण्यात येत आहे.

१३) सदर प्रकल्प योजनेसाठी राज्य शासनाकडून दिले जाणारे दुय्यम कर्ज सहाय्य हे प्रकल्पाचा मुख्य कर्ज सहाय्याची परतफेड झाल्यानंतर सदर दुय्यम कर्ज सहाय्याची परतफेड व्याजासहित संबंधित प्रकल्प अंमलबजावणी संस्था/एमएमआरडीए यांनी करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

१४) सदर मेट्रो रेल्वे प्रकल्पांच्या प्रस्तावित राज्यशासनाच्या दुय्यम कर्ज सहाय्याची रक्कम ही संबंधित प्रकल्प अंमलबजावणी संस्थेने/एमएमआरडीएने त्यांना ज्याबाबीसाठी दुय्यम कर्ज मंजूर केले आहे त्याच बाबीवर त्यांनी केलेल्या खर्चाच्या प्रतिपूर्तीच्या स्वरुपात अदा करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

१५) जर एमएमआरडीए व्याजापोटी रु.३७१ कोटी राज्यशासनास देणे लागत असेल तर सदर रक्कम राज्यशासनास एमएमआरडीएने परत करावी अन्यथा, सदर रक्कम एमएमआरडीएच्या प्रकल्पासाठी अनुज्ञेय असलेल्या दुय्यम कर्ज सहाय्याच्या रक्कमेतून समायोजित करण्यात येईल, अशा सूचना एमएमआरडीएस देण्यात येत आहेत .

१६) सोबतच्या परिशिष्ठ-४ मधील तक्त्यात नमूद केल्याप्रमाणे मेट्रो मार्ग २ - दहिसर - चारकोप - वांद्रे - मानखुर्द मार्गाचा टप्पा क्र. २ ब- डी.एन.नगर - मंडाळे आणि मेट्रो मार्ग ४ - वडाळा - घाटकोपर - मुलुंड - ठाणे -कासारवडवली या मेट्रो मार्गाच्या प्राधिकरणाने प्रस्तावित केलेल्या भाडेदरास मान्यता देण्यात येत आहे. तसेच उल्लेखित केलेले भाडे मेट्रो सुरु करण्यापूर्वी वित्तीय व्यवहार्यता तपासून गरज भासल्यास त्यामध्ये आवश्यक बदल करण्याचे अधिकार वापरण्यास एमएमआरडीएस/ प्राधिकरणास प्राधिकृत करण्यास आणि त्याप्रमाणे भाडे निश्चिती बाबतची जबाबदारी एमएमआरडीएची राहील यास मान्यता देण्यात येत आहे.

१७) शासकीय / निमशासकीय /स्थानिक स्वराज्य संस्था यांच्या सदर प्रकल्पासाठी कायमस्वरुपी आवश्यक असलेल्या जमिनी मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाकडे नाममात्र दराने भाडेतत्वावर हस्तांतरित करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

१८) मेट्रो मार्ग २ब आणि मेट्रो मार्ग ४ प्रकल्प वेळेवर पूर्ण करण्यासाठी मेट्रो रेल्वे स्थानक सुविधांकरीता व तसेच कारडेपोकरीता आवश्यक असलेल्या खाजगी जमिनी मेट्रो रेल्वे अधिनियम, २००९/ मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण अधिनियम, १९७४/महाराष्ट्र प्रादेशिक व नगररचना अधिनियम, १९६६ /नविन केंद्रीय भूसंपादन व पुनर्वसन व पुनर्वसाहत अधिनियम, २०१३ अंतर्गत संपादन करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

१९) मेट्रो मार्ग २ब प्रकल्पाच्या दुरुस्ती व देखभाल डेपोसाठी मंडाळे येथील जमीन व मेट्रो मार्ग ४ प्रकल्पाकरीता दुरुस्ती व देखभाल आगारासाठी ओवाळे येथील २० हे. आणि विक्रोळी येथील गोदरेजच्या ताब्यात असलेल्या १५.५ हे. जमीन वापरण्यास मान्यता देण्यात येत आहे. तसेच उपलब्धतेनुसार व आवश्यकतेप्रमाणे इतर जागा /महाराष्ट्र प्रादेशिक व नगररचना अधिनियम, १९६६ अन्वये जमीन वापर फेरबदल करुन हस्तांतरित करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२०) सदर प्रकल्पांतर्गत प्रकल्पबाधितांचे (PAP) पुनर्वसन व पुनर्वसाहत बहूपक्षीय /आंतरराष्ट्रीय बँक किंवा इतर आंतरराष्ट्रीय वित्तीय संस्थेने सहमती दर्शविल्याप्रमाणे "मुंबई नागरी परिवहन प्रकल्प पुनर्वसन व पुनर्वसाहत धोरण (MUTP -R & R Policy)" नुसार करण्याकरीता मान्यता देण्यात येत आहे.

२१) सोबतच्या परिशिष्ठ-५ मध्ये नमुद केल्याप्रमाणे "समर्पित नागरी परिवहन निधी" च्या उभारणीस आणि इतर स्त्रोतामधुन उपलब्ध झालेला निधी "समर्पित नागरी परिवहन निधी" मध्ये जमा करुन तो निधी सदर प्रकल्पासाठी, भविष्यात येणाऱ्या पायाभुत सुविधा प्रकल्पाच्या अंमलबजावणी करण्यासाठी तसेच कार्य व देखभाल (O&M) इ. साठी प्राधिकरणास वापरण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२२) मेट्रो मार्ग २ब आणि मेट्रो मार्ग ४ प्रकल्पाच्या दुरुस्ती व देखभाल आगारासाठी अनुक्रमे मंडाळे आणि ओवाळे येथील जमीन व उपलब्धतेनुसार व आवश्यकतेप्रमाणे इतर जमीन वापरात आवश्यक ते बदल करुन मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाकडे नाममात्र दराने भाडेतत्वावर हस्तांतरित करण्यास मान्यता देण्यात येत आहे. तसेच अतिरिक्त जमीन प्रकल्पासाठी निधी उभारण्याच्या दृष्टीने रहिवासी/वाणिज्यिक विकास करण्यासाठी मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाकडे नाममात्र दराने हस्तांतरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२३) मेट्रो मार्ग २ब आणि मेट्रो मार्ग ४ मार्गालगतच्या शासकीय व निमशासकीय संस्थांच्या मोकळया जागांचा मेट्रो रेल्वे बांधकाम कालावधी दरम्यान तात्पुरता वापर करण्यासाठी परवानगी देण्यात येत आहे व यादृष्टीने संबंधित विभागांनी सदर मोकळया जागा मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाकडे सुपूर्द करण्याबाबत त्या विभागांस निर्देश देण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२४) मेट्रो रेल्वे स्थानक व कारडेपोच्या जागेचा व्यावसायिक वापर करण्यास परवानगी देणे व त्यानुसार सदर जमिनीचा वाणिज्यिक विकास करण्याचे अधिकार मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाला देण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२५) मेट्रो मार्ग २ - दहिसर - चारकोप - वांद्रे - मानखुर्द मार्गाचा टप्पा क्र. २ ब- डी.एन.नगर - मंडाळे आणि मेट्रो मार्ग ४ - वडाळा - घाटकोपर - मुलुंड - ठाणे -कासारवडवली हे प्रकल्प "निकडीचे सार्वजनिक प्रकल्प" व "महत्वपूर्ण नागरी वाहतूक प्रकल्प" म्हणून घोषित करण्यास मान्यता देण्यात येत आहे. त्याअनुषंगाने, संबंधित संस्था जसे की, बृहन्मुंबई महानगरपालिका, सार्वजनिक बांधकाम विभाग, यांना लवकरात लवकर तत्वत: मान्यता देण्याचे निर्देश देण्यास मान्यता देण्यात यावी तसेच सदर प्रकल्पास रेल्वे (पश्चिम/मध्य) यांनी लवकरात लवकर मान्यता व आवश्यक त्या परवानग्या प्रदान कराव्यात म्हणून रेल्वे मंत्रालयाने त्यांना निदेश द्यावेत याकरिता रेल्वे मंत्रालयास विनंती करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२६) मेट्रो मार्ग २ब आणि मेट्रो मार्ग ४ प्रकल्पाकरीता मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणास "विशेष नियोजन प्राधिकरण" म्हणून नियुक्त करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२७) महाराष्ट्र विद्युत नियामक मंडळाकडून मेट्रो प्रकल्पांकरीता सवलतीच्या दरात 'ना नफा ना तोटा' या तत्त्वावर एमएमआरडीएस वीज उपलब्ध करुन देण्याची शासनामार्फत शिफारस करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२८) मेट्रो मार्ग २ - दहिसर - चारकोप - वांद्रे - मानखुर्द मार्गाचा टप्पा क्र. २ ब- डी.एन.नगर - मंडाळे आणि मेट्रो मार्ग ४ - वडाळा - घाटकोपर - मुलुंड - ठाणे -कासारवडवली मेट्रो या मार्गाकरीता कार्य आणि देखभालच्या (O&M) दरम्यान सुरक्षिततेसाठी तैनात करावयाचे सुरक्षारक्षक, आवश्यक साहीत्य (जसे बंदुक, अश्रुधूर, श्वान पथक) इत्यादींचा पुरवठा आणि यांवर येणारा खर्च हा एमएमआरडीएने करावा असे निर्देश एमएमआरडीएस देण्यात येत आहेत.

२९) प्रस्तावित मेट्रो मार्ग २ब आणि मेट्रो मार्ग ४ मार्गिकेमध्ये काही बस डेपो/स्थानके हे बेस्टच्या मालकी हक्काचे असून, याकरीता मेट्रोचे बेस्ट सेवेशी एकात्मीकरण आणि बस डेपोचे वाणिज्यिक विकास करणे शक्य आहे. सदरच्या प्रस्तावास बेस्ट प्रशासनाने यापुर्वीच मान्यता देण्यात येत असून निधी उभारणे आणि विभागणी याबाबतची यंत्रणा तयार केली जाऊ शकते. याबाबत तत्वत: मान्यता देण्यात येत आहे.

३०) शासकीय / खाजगी संस्थांना मेट्रो प्रकल्प हे इतर प्रकल्पापेक्षा महत्वाचा असेल असे निर्देश देण्यास प्राधिकरणाला प्राधिकृत करण्यात येत आहे.

३१) मेट्रो प्रकल्प २अ २-ब ७ आणि मेट्रो मार्ग-४ करीता मुंबई महानगर प्रदेशात प्रवाशांच्या सोयीसाठी प्राधिकरणामार्फत एकात्मिक तिकिटीकरण पद्धती (ITS) सुरू करण्याच्या प्रस्तावास मान्यता देण्यात येत आहे.

३२) सदर प्रकल्प द्विपक्षीय/बहुपक्षीय/आंतरराष्ट्रीय/आंतरदेशीय अशा विविध वित्तीय संस्थांकडून कर्ज घेऊन त्याच्या मुद्दलाची परतफेड तसेच व्याजाची परतफेड याची जबाबदारी संबंधित प्रकल्प अंमलबजावणी संस्था/एमएमआरडीए यांची राहील. त्यामुळे शासनावर अतिरिक्त भार येणार नाही याची खबरदारी घेण्यात यावी, असे निर्देश एमएमआरडीएस देण्यात येत आहेत.

३३) सदर प्रकल्पासाठी बाह्यसाहित कर्ज शासनास उपलब्ध झाल्यास ते संबंधित प्रकल्प अंमलबजावणी संस्था/एमएमआरडीए यांना उपलब्ध करुन देताना या कर्जाबाबतच्या अटी व शर्ती, मुद्दलाची परतफेड, व्याजाची परतफेड बाबत दुय्यम कर्ज सहाय्य करारनामा (subsidiary Loan Agreement) करण्याची कार्यवाही करण्यात यावी . सदर कर्ज व त्यावरील व्याज यांचे दायित्वाची जबाबदारी संबंधित प्रकल्प अंमलबजावणी संस्था/एमएमआरडीए यांची राहील, असे एमएमआरडीएस निर्देश देण्यात येत आहेत.

३४) सदर प्रकल्पाच्या अंदाजित किंमत, प्रकल्पामधुन मिळणारा परतावा याकरिता प्रकल्प अहवालात घेण्यात आलेल्या गृहीतकांची कसोशीने तपासणी करणे व ह्या बाबींवर स्वतंत्र अभिप्राय (Second opinion) घेण्याची कार्यवाही मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाने करावी, असे निर्देश एमएमआरडीएस देण्यात येत आहेत.

३५) सदर मेट्रो प्रकल्पाच्या बांधकाम दरम्यान होणारी वाहतुकीची गैरसोय टाळण्यासाठी वाहतूक पोलीस विभागाशी समन्वय साधुन योग्य तो नाविन्यपुर्ण वाहतूक वळण (Innovative Traffic Diversion) नियोजन / आराखडा मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाने तयार करावा तसेच प्रकल्पाचे बांधकाम कालावधी दरम्यान वाहतूक कोंडी होणार नाही याची काळजी घ्यावी, असे निर्देश एमएमआरडीएस देण्यात येत आहेत.

३६) मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणामार्फत हाती घेण्यात येणाऱ्या मेट्रो प्रकल्पाच्या कार्य प्रणाली चालन (O&M) साठी एक व्यवस्थापन व्यवस्था मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाने तयार करावी, असे निर्देश एमएमआरडीएस देण्यात येत आहेत.

३७) सदर प्रकल्पासाठी बाह्यसाहित कर्ज मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण घेणार आहे. तथापि, सदर कर्ज सहाय्यासाठी राज्यशासनामार्फत हमी देण्याची आवश्यकता भासल्यास, राज्यशासनाकडून हमी देण्यास तत्वत: मान्यता देण्यात येत आहे.

३८) देशातील विविध मेट्रो प्रकल्प राबविण्यासाठी केंद्रशासनामार्फत निधी उपलब्ध करुन देण्यात येत आहे. त्याच धर्तीवर या प्रकल्पांकरीता केंद्रशासनाकडून निधी मिळविण्याकरिता राज्यशासनामार्फत पाठपुरावा करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

सदरचा शासन निर्णय नियोजन विभाग अनौपचारीक संदर्भ क्र.१७४/१४४४, दिनांक १२.०७.२०१६ व वित्त विभाग अनौपचारीक संदर्भ क्र.१९३/व्यय-३, दिनांक १५.०७.२०१६ अन्वये प्राप्त अभिप्राय व त्यासंदर्भात मंत्रिमंडळाने दिनांक २७ सप्टेंबर, २०१६ रोजीच्या बैठकीत दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०१६१०२५१७५१०९७०२५ असा आहे. सदर शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Shriram Dattatraya Yadav

Digitally signed by Shriram Dattatraya Yadav
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Deputy Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=50cb0ce4cc4fe54c74f42b860354e86ec00b3b36f5f215c9f7658e611006a200, cn=Shriram Dattatraya Yadav
Date: 2016.10.25 17:55:33 +05'30'

**(श्रीराम यादव)**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) मा. राज्यपाल, महाराष्ट्र राज्य, यांचे सचिव.
२) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
३) मा. राज्यमंत्री (नवि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
४) मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
५) मा. सचिव, शहरी विकास मंत्रालय, भारत सरकार, निर्माण भवन, नवी दिल्ली
६) अपर मुख्य सचिव (महसूल), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
७) अपर मुख्य सचिव, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
८) अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
९) अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
१०) प्रधान सचिव (नवि-१), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
११) प्रधान सचिव (पदुम), कृषी, पशु संवर्धन, दुग्ध व्यवसाय विकास व मत्स्य व्यवसाय विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२.
१२) प्रधान सचिव (परिवहन), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
१३) प्रधान सचिव (उद्योग) उद्योग ऊर्जा व कामगार विभाग , मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
१४) प्रधान सचिव (ऊर्जा) उद्योग ऊर्जा व कामगार विभाग , मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
१५) प्रधान सचिव गृहनिर्माण विभाग , मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
१६) प्रधान सचिव पर्यावरण विभाग , मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
१७) सचिव (नवि-२), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
१८) सचिव (विशेष प्रकल्प), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
१९) सचिव शालेय शिक्षण व क्रीडा विभाग , मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
२०) सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
२१) नोंदणी महानिरिक्षक व नियंत्रक मुद्रांक नियंत्रक पुणे
२२) व्यवस्थापकीय संचालक, मंबई आंतरराष्ट्रीय विमानतळ प्रायव्हेट लिमिटेड.
२३) महानगर आयुक्त, मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण, वांद्रे (पूर्व), मुंबई ४०० ०५१.
२४) विभागीय आयुक्त, कोकण विभाग, नवी मुंबई.

२५) पोलिस आयुक्त, मुंबई/ठाणे.
२६) आयुक्त, बृहन्मुंबई महानगरपालिका, मुंबई.
२७) व्यवस्थापकीय संचालक, सिडको, मुंबई.
२८) आयुक्त, ठाणे महानगरपालिका, मुंबई
२९) आयुक्त, दुग्ध व्यवसाय विकास, वरळी, मुंबई.
३०) जिल्हाधिकारी मुंबई शहर/मुंबई उपनगरे/ठाणे, मुंबई.
३१) व्यवस्थापकीय संचालक, मुंबई मेट्रो रेल कॉर्पोरेशन लि. मुंबई.
३२) महाव्यवस्थापक, मध्य रेल्वे, मुंबई.
३३) महाव्यवस्थापक, पश्चिम रेल्वे, मुंबई.
३४) महाव्यवस्थापक, बृहन्मुंबई विद्युत पुरवठा आणि परिवहन उपक्रम, (बेस्ट), मुंबई.
३५) महाव्यवस्थापक, महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळ मुंबई
३६) महाव्यवस्थापक, ठाणे महानगरपालिका परिवहन उपक्रम, ठाणे.
३७) सह जिल्हा निंबंधक व मुद्रांक जिल्हाधिकारी मुंबई शहर/मुंबई उपनगरे/ ठाणे, मुंबई
३८) सह पोलिस आयुक्त वाहतूक, मुंबई/ठाणे
३९) संचालक, नगर रचना, मध्यवर्ती प्रशासकीय इमारत, पुणे.
४०) सह सचिव, नगर रचना, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
४१) उप सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
४२) उप सचिव (नवि-२१), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
४३) निवड नस्ती (नवि-७).

(नगर विकास विभाग शासन निर्णय क्रमांक : एमआरडी-३३१६/प्र.क्र.४१/नवि-७, दिनांक २५ ऑक्टोबर २०१६ चे सहपत्र)

## परिशिष्ट १

## मेट्रो टप्पा २ (ब) - डी.एन.नगर - मंडाळे या मेट्रो मार्गाच्या प्रकल्पाची ठळक वैशिष्टये

| अ.क्र. | तपशील | |
|---|---|---|
| १ | स्टँन्डर्ड गेज | १४३५ मि.मी. |
| २ | मार्गाची लांबी | २३.६४३ कि.मी. |
| ३ | एकूण स्थानके | २२ |
| ४ | गाडयांचे वेळापत्रक | वर्ष २०२१ - प्रति ६.० मिनिट<br>वर्ष २०३१ - प्रति ५.५ मिनिट |
| ५ | प्रस्तावित कार डेपो | २२.०० हेक्टर<br>(मंडाळे) |
| ६ | इतर लागणारी जमीन (अंदाजित)<br>कार डेपो वगळून | खाजगी - ३.१७ हेक्टर<br>शासकीय - ५.१२ हेक्टर |
| ७ | प्रकल्प राबविण्याचा कालावधी | एप्रिल २०१६ ते मार्च २०२०<br>(४२ महिने) |
| ८ | तात्पुरती लागणारी जमीन<br>(बांधकाम कालावधी दरम्यान) | ११.०० हेक्टर |
| ९ | मूळ किंमत (जमिनीची किंमत व कर वगळून) | रु. ५९८३ कोटी |
| १० | मूळ जमिनीची किंमत | रु. ९३५.४० कोटी |
| ११ | जमिनीवरील अकस्मित खर्च (३%) | रु. २८.०६ कोटी |
| १२ | प्रकल्पाची मूळ किंमत | रु. ६९४७ कोटी |
| १३ | राज्यशासनाचा कर | रु. ४६३ कोटी |
| १४ | केंद्रशासनाचा कर | रु. ८५१ कोटी |
| १५ | एकूण कर (राज्य व केंद्रशासनाचा कर) | रु. १३१४ कोटी |
| १६ | प्रकल्पाची मूळ किंमत (केंद्र शासनाच्या करांसह ) | रु. ८२६१ कोटी |
| १७ | पुर्नवसन व पुर्नवसाहत यांचा खर्च | रु. ९१.५९ कोटी |
| १८ | प्रकल्प पूर्णत्वाची किंमत<br>(राज्य शासनाचा कर वगळून, ७.५% दरवाढ, २०१९ नुसार) | रु. १०२६१ कोटी<br>(१०९७०-७०९) |
| १९ | प्रकल्प पूर्णत्वाची किंमत (सर्व करांसहित) | रु. १०९७० कोटी |

| **अ.क्र.** | **तपशील** | |
|---|---|---|
| २० | EIRR (Economic Internal Rate of Return) | २५.२० % |
| २१ | FIRR (Financial Internal Rate of Return) with PD | १०.७८ % |
| २२ | प्रवासी क्षमता<br>(६ डब्यांची गाडी) | १) ६ प्रवासी प्रतिवर्ग मीटर प्रमाणे - १७५६ प्रवासी क्षमता.<br>२) ८ प्रवासी प्रतिवर्ग मीटर प्रमाणे - २२४४ प्रवासी क्षमता. |
| २३ | प्रतिताशी प्रतिदिशा प्रवासी संख्या (PHPDT) | वर्ष २०२१ - ३५,१४२<br>वर्ष २०३१ - ३८,५०९ |
| २४ | दैनंदिन प्रवासी संख्या | वर्ष २०२१-२२ - ८.९० लाख<br>वर्ष २०३१-३२ - १०.४९ लाख |

## परिशिष्ट - २

## मेट्रो मार्ग ४ - वडाळा - घाटकोपर - मुलुंड - ठाणे -कासारवडवली या मेट्रो मार्गाच्या प्रकल्पाची ठळक वैशिष्टये:-

| अ.क्र. | तपशील | |
|---|---|---|
| १ | स्टॅन्डर्ड गेज | १४३५ मि.मी. |
| २ | मार्गाची लांबी | ३२.३२ कि.मी. |
| ३ | एकूण स्थानके | ३२ |
| ४ | गाडयांचे वेळापत्रक | वर्ष २०२१ - प्रति ३.७५ मिनिटे<br>वर्ष २०३१ - प्रति ३.०० मिनिटे |
| ५ | प्रस्तावित कार डेपो | २० हेक्टर (ओवाळे)<br>१५.५ हेक्टर (गोदरेज) |
| ६ | इतर लागणारी जमीन (अंदाजित)<br>कार डेपो सहित | खाजगी - ३७.९६ हेक्टर<br>शासकीय - ५.५५ हेक्टर |
| ७ | प्रकल्प राबविण्याचा कालावधी | एप्रिल २०१७ ते जुलै २०२१ (५२ महिने) |
| ८ | तात्पुरती लागणारी जमीन<br>(बांधकाम कालावधी दरम्यान) | १३.२ हेक्टर (शासकीय) |
| ९ | मूळ किंमत<br>(जमिनीची किंमत व कर वगळून) | रु. ७,८४५ कोटी |
| १० | जमिनीची किंमत | रु. १,३०७.४ कोटी |
| ११ | आकस्मित खर्च (३%) | रु. २२८.५० कोटी |
| १२ | राज्यशासनाचा कर (मूळ) | रु. ६३० कोटी |
| १३ | केंद्रशासनाचा कर (मूळ) | रु. १,२९३ कोटी |
| १४ | प्रकल्पाची मूळ किंमत<br>(जमीन व केंद्र शासनाच्या करांसह ) | रु. १०,४८५ कोटी |
| १५ | पुनर्वसन व पुनर्वसाहत यांचा खर्च | रु. १२५.२१ कोटी |
| १६ | प्रकल्पाची मूळ किंमत (सर्व करांसहित) | रु. ११,११५ कोटी |
| १७ | **प्रकल्प पूर्णत्वाची किंमत**<br>(सर्व कर, दरवाढ आणि बांधकाम दरम्यानचे व्याज (IDC) इ. सह) | **रु. १४,५४९ कोटी** |
| १८ | आर्थिक अंतर्गत परतावा दर (EIRR) | २२.७९ % |
| १९ | वित्तीय अंतर्गत परतावा दर मालमत्ता विकासासह (FIRR with PD) | ८.२२ % |
| २० | प्रवासी क्षमता<br>(६ डब्यांची गाडी) | १) ६ प्रवासी प्रतिवर्ग मीटर प्रमाणे - १७५६ प्रवासी क्षमता.<br>२) ८ प्रवासी प्रतिवर्ग मीटर प्रमाणे - |

| **अ.क्र.** | **तपशील** | |
|---|---|---|
| | | २२४४ प्रवासी क्षमता. |
| २२ | प्रतिताशी प्रतिदिशा प्रवासी संख्या (PHPDT) | वर्ष २०२१ - २८,१०७<br>वर्ष २०३१ - ३३,४१७ |
| २३ | दैनंदिन प्रवासी संख्या | वर्ष २०२१-२२ - ८.७० लाख<br>वर्ष २०३१-३२ - १२.१३ लाख |

## परिशिष्ट -३

### अ) मेट्रो टप्पा २ (ब) - डी.एन.नगर - मंडाळे या मेट्रो मार्गाच्या प्रकल्पामध्ये राज्यशासन/केंद्रशासन/एमएमआरडीए यांची आर्थिक भागीदारी

| अ.क्र. | आर्थिक सहभागी संस्था | तपशिल | रक्कम रु कोटीत |
|---|---|---|---|
| १. | मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाचा सहभाग | अ) स्थापत्य कामासाठी लागणारा खर्च = रु. ३१३० कोटी<br>ब) एकूण केंद्रीय कराकरीता रु. ११६२ कोटी रुपयांचा ५०% = रु. ५८१ कोटी | रु.३७११ |
| २ | केंद्र शासनाकडून (५०%) आणि राज्य शासनाकडून (१००%) कर्ज बिनव्याजी दुय्यम कर्ज रुपाने राज्यशासनाकडून | अ) केंद्रीय कराकरीता रु. ११६२ कोटी रुपयांचा ५०% राज्य शासनाचा सहभाग = रु. ५८१ कोटी<br>ब) राज्य स्तरीय /स्थानिक करांकरीता ७०९ कोटी | रु १२९० |
| ३ | राज्य शासन सहाय्य | कारडेपोसाठी जमीन व इतर उपलब्ध असलेल्या जमीन (शासकीय जमीन नाममात्र दराने प्रकल्पासाठी उपलब्ध करणे) | रु १२७४ |
| ४ | कर्ज सहाय्य | ADB (पूर्णत्वाची किंमत) | रु ४६९५ |
| ५ | मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाचा सहभाग | बांधकाम कालावधी दरम्यानचे व्याज (IDC) | रु.१६ |
| | **एकूण पूर्णत्वाची किंमत** | | **रु १०९८६** |

**ब) मेट्रो मार्ग ४ - वडाळा - घाटकोपर - मुलुंड - ठाणे -कासारवडवली या मेट्रो मार्गाच्या प्रकल्पामध्ये राज्यशासन/केंद्रशासन/एमएमआरडीए यांची आर्थिक भागीदारी**

| अ.क्र. | आर्थिक सहभागी संस्था | तपशिल | रक्कम रु. कोटीत |
|---|---|---|---|
| १. | मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाचा सहभाग | अ) स्थापत्य कामासाठी लागणारा खर्च = रु. ५,०४७ कोटी<br>ब) बांधकाम कालावधी दरम्यानचे व्याज (IDC) = ४७ कोटी<br>क) एकूण केंद्रीय कराकरीता रु. १,७३४ कोटी रुपयांचा ५०% = रु. ८६७ कोटी | ५,९६१ |
| २. | **राज्य शासन सहाय्य:**<br>केंद्र शासनाकडून (५०%) आणि राज्य शासनाकडून (१००%) कर्ज बिनव्याजी दुय्यम कर्ज रुपाने राज्यशासनाकडून | अ) केंद्रीय कराकरीता रु. १,७३४ कोटी रुपयांचा ५०% राज्य शासनाचा सहभाग = रु. ८६७ कोटी<br>ब) राज्य शासनाचा कर = रु.९९४ कोटी<br>क) जमिनीची किंमत = १,८३२ कोटी | **३,६९३** |
| ३. | **प्रणालीची किंमत** | | |
| | अ. कर्ज सहाय्य प्रणालीची किंमत ८०% | | ३,९१६ |
| | ब. उर्वरित २०% प्राधिकरणामार्फत | | ९७९ |
| | **एकूण पूर्णत्वाची किंमत** | | **१४,५४९** |

## परिशिष्ट -४

## <u>मुंबई मेट्रो मार्ग २ ब डी.एन.नगर - मंडाळे व मुंबई मेट्रो मार्ग ४ वडाळा - घाटकोपर - मुलुंड - ठाणे - कासारवडवली या मार्गांचे सुरवातीचे प्रवाशी भाडेदर तक्ता</u>

मेट्रो मार्ग-२अ, २ब आणि मार्ग-७ या प्रकल्पासाठी दिल्ली मेट्रो रेल महामंडळ यांनी रु. १०, २० आणि ३० असे भाडेदर प्रस्तावित केले आहेत. परंतु मेट्रो २अ, २ब, मेट्रो मार्ग -७ आणि मेट्रो मार्ग -४ या मार्गांचे तिकिट एकत्रिकरण होत असून त्याची लांबी सुमारे ९३ कि.मी. पर्यंत असणार आहे. त्यामुळे वरील सर्व बाबींचा विचार करुन मेट्रो मार्गाचे सुरुवातीचे भाडेदर खालील प्रमाणे प्राधिकरणाने प्रस्तावित करण्यात आलेले आहेत.

| अंतर (कि.मी.) | ०-३ | ३-१२ | १२-१८ | १८-२४ | २४-३० | ३०-३६ | ३६-४२ | >४२ |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| भाडे (रु.) | १० | २० | ३० | ४० | ५० | ६० | ७० | ८० |

वर उल्लेखित केलेले भाडे मेट्रो सुरु करण्यापूर्वी वित्तीय व्यवहार्यता तपासून गरज भासल्यास त्यामध्ये आवश्यक बदल करण्याचे अधिकार प्राधिकरणास देण्याचे प्रस्तावित आहे. मेट्रो कायद्यानुसार सुरुवातीच्या भाडेदरात पुढील बदल करण्याचे अधिकार भाडे निर्धारण समितीला (Fare Fixation Committee) आहेत.

## परिशिष्ट -५

### मेट्रो प्रकल्प राबविण्याकरीता लागणारा निधी उभारण्याचे इतर विविध स्त्रोत:-

मेट्रो मार्ग -२ दहिसर-चारकोप-वांद्रे-मानखुर्द मार्गाचा टप्पा २ ब डी.एन.नगर - मंडाळे आणि मेट्रो मार्ग ४ - वडाळा - घाटकोपर - मुलुंड - ठाणे -कासारवडवली या मेट्रो प्रकल्पाकरीता निधी उभारण्याचे स्त्रोत, मेट्रो मार्ग - २अ आणि ७ या प्रकल्पाच्या धर्तीवर खालीलप्रमाणे प्रस्तावित आहेत:-

**अ.** मेट्रो मार्गिकांच्या दोन्ही बाजूस ५०० मी. अंतरापर्यंत येणाऱ्या जमिनीवर, अधिमूल्य आकारुन अतिरिक्त चटई क्षेत्र निर्देशांक (एफ.एस.आय.) देण्याची तरतूद विकास नियंत्रण नियमावलीत करुन त्यानुसार अधिमूल्याची रक्कम संबंधित क्षेत्रातील नियोजन प्राधिकरणाने वसूल करणे व अशा वाढीव चटईक्षेत्र निर्देशांकापोटी वसूल केलेल्या अधिमूल्याच्या रक्कमेपैकी ५०% रक्कम मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाकडे वर्ग करणे.

**ब.** महाराष्ट्र प्रादेशिक नियोजन व नगररचना अधिनियम, १९६६ च्या तरतूदीनुसार आकारण्यात येणारे विकास शुल्क शासन अधिसूचित करेल, असे महत्वपूर्ण नागरी वाहतूक प्रकल्प राबविण्यात येणाऱ्या शहरात विकास शुल्कात १००% पर्यंत वाढ करुन आकारण्याविषयी कायद्यातील तरतूदीनुसार वसूल होणारी वाढीव रक्कम मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाकडे वर्ग करणे.

**क.** महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियम, १९४९ च्या तरतूदीनुसार मालमत्तेचे मुद्रांक शुल्कासोबतच महत्वपूर्ण नागरी वाहतूक प्रकल्प राबविण्यात येणाऱ्या शहरात १% अधिभार लावण्यासाठी सन २०१५ चा महाराष्ट्र अधिनियम क्रमांक ३७, दिनांक २१.०८.२०१५ अन्वये महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियम १९४९ चे कलम १४९ मध्ये सुधारणा करण्यात आली आहे. त्या धर्तीवर शासनाने बृहन्मुंबई महानगरपालिका क्षेत्रात महत्वपूर्ण नागरी वाहतूक प्रकल्प राबविण्याचे अधिसूचित केल्यास, महानगरपालिका क्षेत्रात मुंबई मुंद्राक अधिनियम, १९५८ अन्वये स्थावर मालमत्तेचे अनुक्रमे विक्री, देणगी व फलोपभोग गहाण यावरील संलेखावर बसवायच्या मुद्रांक शुल्कासोबतच जमिनी व इतर स्थावर मालमत्तेचे विक्री किंवा देणगीच्याबाबतीत अशारीतीने स्थित असलेल्या मालमत्तेच्या मुल्यांवर व फलोपभोग गहाणाच्या संलेखाच्या बाबतीत संलेखात मांडण्यात आलेल्या संलेखाद्वारे सुरक्षित रक्कमेवर १% अधिभार लावण्याची तरतूद मुंबई महानगरपालिका अधिनियम १८८८ मध्ये करुन अशा प्रत्यक्ष जमिनी व इतर स्थावर मालमत्तेचे अनुक्रमे विक्री, देणगी व फलोपभोग गहाण संलेखाच्या नोंदणीच्या वेळी सदर अधिभाराची रक्कम संबंधित जिल्हा उपनिबंधकांनी / दुय्यम निबंधकांनी वसूल करणे व शासनाने या माध्यमातून वसूल झालेल्या रक्कमेएवढे अनुदान दरवर्षी मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणास वर्ग करणे.

**ड.** मेट्रो कार डेपोच्या जागेचे वाणिज्यिक विकसनाव्दारे प्राप्त होणारे उत्पन्न प्रस्तुत प्रकल्पासाठी वापरणे.

**इ.** देशातील विविध मेट्रो प्रकल्प राबविण्यासाठी केंद्रशासनामार्फत निधी उपलब्ध करुन देण्यात येत आहे. त्याचधर्तीवर या प्रकल्पाकरीता केंद्र शासनाकडून निधी मिळविण्याकरीता

राज्यशासनामार्फत पाठपुरावा करण्यात यावा. तथापी, केंद्र शासनाच्या निधी उपलब्धतेची वाट न पाहता प्राधिकरणाचा निधी वापरुन मेट्रो प्रकल्पाची अंमलबजावणी करण्यात यावी.

**ई.** मेट्रो रेल्वे स्थानकावरील जाहिरात व पार्किंगपासून मिळणारे उत्पन्न या प्रकल्पासाठी वापरणे इ.

सदर विविध स्रोतातून प्राप्त होणारा निधी हा मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाच्या स्तरावर एका **"समर्पित नागरी परिवहन निधीमध्ये"** ठेवण्याचे संकल्पित असून त्याचा विनियोग सदर मेट्रो प्रकल्पासाठी राज्यशासनाच्यावतीने लागणाऱ्या समभागाची रक्कम मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाकडे वर्ग करण्याकरीता तसेच कर्जाच्या परतफेडीसाठी निधी अपूरा पडत असल्यास स्वतंत्र पूरक निधी उभारणी करण्यात यावा.

***